**पुराभिलेख संचालनायाच्या मुख्य कार्यालय, मुंबई यांच्या नुतनीकरणासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- मपुवि-२०२३/प्र.क्र.१३४/सां.का. २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २३ जून, २०२३.

**वाचा** :- १. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे पत्र क्र. संकीर्ण २०२३/प्र.क्र.९८/ सां.का.२ दिनांक ०८ मे, २०२३

२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्र. मुअ(मुं)/ का-२/ २३६५ / २०२३, दिनांक २५ मे, २०२३

३. संचालक, पुराभिलेख संचालनालय मुंबई यांचे पत्र क्र. पुरा.संचा/प्रशा/मुसेपु-५०/५५/ शोअअ//२०२३/ बी-१६३४, दिनांक ०९ जून, २०२३.

**प्रस्तावना-**

पुराभिलेख संचालनालयास संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये कार्यालयाच्या नुतनीकरणाबाबत प्रस्ताव सादर करण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या होत्या. त्यानुसार पुराभिलेख संचालनालयाने संदर्भ क्रमांक ३ येथील पत्राद्वारे पुराभिलेख संचालनालय, मुंबई मुख्यालय येथील कार्यालयामध्ये खुर्च्या, पार्टीशन व कपाटांचे (स्टोरेज) नुतनीकरण करण्यासाठी रु.९०,५९,६५६/- (अक्षरी रुपये नव्वद लाख एकोणसाठ हजार सहाशे छपन्न फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्ताव शासनाच्या मंजूरीसाठी सादर केला आहे. संदर्भ क्रमांक २ अन्वये मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी पुराभिलेख संचालनालय, मुंबई मुख्यालय येथील कार्यालयाच्या नुतनीकरणासाठी रु.९०,५९,६५६/- (अक्षरी रुपये नव्वद लाख एकोणसाठ हजार सहाशे छपन्न फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास तांत्रिक सहमती प्रदान केली आहे. त्यानुसार या कामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

पुराभिलेख संचालनालय, मुंबई कार्यालयाच्या नुतनीकरणाच्या कामासाठी रु. ९०,५९,६५६/- (अक्षरी रुपये नव्वद लाख एकोणसाठ हजार सहाशे छपन्न फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. उपरोक्त कामासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (०१) (०२) पुराभिलेख कार्यालये (अनिवार्य) (२२०५ १७९५) १३- कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षामधून करण्यात यावा.

०३. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २० सप्टेंबर, २०१९ नुसार तसेच, सार्वजनिक बांधकाम विभाग शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०६२३१७५०००३०२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2023.06.23 18:52:01 +05'30'

**( सुमंत पाष्टे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई
७. उप सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उप सचिव (व्यय-१५, वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११.अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.संचालक, पुराभिलेख संचालनालय, मुंबई
१३.निवड नस्ती, सां.का.२.